"दही हंडी" या उत्सवास युनेस्को मौखिक आणि अमूर्त वारशाचा प्रस्ताव तयार करण्याकरीता ई-निविदा पद्धतीने तज्ञ वास्तुविशारद संस्था यांची निवड करणेबाबतच्या निविदेस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत....

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : पुवसं-२०२३/प्र.क्र.३३१/सां.का.३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १८ जुलै, २०२४.

**<u>वाचा</u> :-** संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांचे पत्र जा. क्र.तंत्र २०२४/युनेस्को-दही हंडी/१५१५, दि. ०८ एप्रिल, २०२४.

**<u>प्रस्तावना</u>-:**

**“दही हंडी”** या उत्सवास युनेस्को मौखिक आणि अमूर्त वारशाचा दर्जा मिळणेबाबतचा प्रस्ताव तयार करण्याकरीता ई-निविदा पद्धतीने तज्ञ वास्तुविशारद संस्था यांची निवड करणेबाबतच्या निविदेस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी संदर्भाधीन पत्रान्वये मान्यतेस्तव सादर केला आहे. सदर न्यूनतम निविदेच्या प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सदर शासन निर्णयान्वये **“दही हंडी”** या उत्सवास युनेस्को मौखिक आणि अमूर्त वारशाचा दर्जा मिळणेबाबतचा प्रस्ताव तयार करण्याकरीता ई-निविदा पद्धतीने तज्ञ वास्तुविशारद संस्था यांची निवड करणेबाबतच्या मे. तेजस्विनी आफळे असोशिएटस, पुणे यांच्या रु.९,४८,१३०/- (अक्षरी रुपये नऊ लक्ष अठ्ठेचाळीस हजार एकशे तीस मात्र) (सर्व करासहीत) इतक्या रकमेच्या खालील न्युनतम निविदेस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे .

| | | |
|---|---|---|
| १ | **ई-निविदा भरणाऱ्या वास्तुविशारदांचे नाव** | मे. तेजस्विनी आफळे असोशिएट्स, पुणे |
| २ | **ई-निविदाद्वारे वास्तुविशारदांकडून भरण्यात आलेली दराची रक्कम** | रु.९,४८,१३०/- |
| ३ | **अभिप्राय** | या निविदेनुसार मे. तेजस्विनी आफळे असोशिएटस, पुणे यांनी एकूण रु.९,४८,१३०/- इतक्या रकमेच्या मानधनात काम करण्यास सहमती दर्शविली आहे. सदर निविदा ही L-१ आहे. |

०२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०३. सदरहू कामावर होणारा खर्च हा पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मागणी क्र. झेडडी-०२, १०३, पुरातत्वशास्त्र (०१) (०२) पुरातत्वशास्त्र संचालनालय व वस्तुसंग्रहालय (राज्य) (अनिवार्य) २२०५ १३३८ ५० इतर खर्च या लेखाशिर्षातील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या निधीतून भागविण्यात येणार आहे.

०४. हा शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ६ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१८१७१९१०९७२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT,
2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F,
cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.07.18 17:30:50 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मंत्री (सां.का.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
उपसचिव (सां.का. ३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, सां.का.३.